राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत ( NMSA) मृद आरोग्य पत्रिका ( SHC ) कार्यक्रम सन २०१९-२० मध्ये राबविण्याकरीता निधी वितरीत करणे.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २७१९/ प्र.क्र.४३/१ अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०८ नोव्हेंबर, २०१९

वाचा :-

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य पत्रिका योजनेच्या मार्गदर्शक सुचना.
२) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग, क्र. वानियो २०१५/प्र.क्र. ५५ / भाग - १ /१५/२ अे, दि. १८ मे, २०१६
३) केंद्र शासनाचे क्र.14-3/2008-Fert Use, दि.१६ मे,२०१८ चे पत्र.
४) केंद्र शासनाचे क्र.16-2/2015 Fert Use दि. २७ जून, २०१८ चे पत्र.
५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक :- मृदस -१४१८/ प्र.क्र.२२०/१७अे, दिनांक २४ ऑगस्ट,२०१८.
६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक :- मृदस -१४१८/ प्र.क्र.२२५/१७अे, दिनांक २७ ऑगस्ट,२०१८.
७) केंद्र शासनाचे क्र.१६-२/२०१५, Fert.Use, दिनांक २१.०२.२०१९ रोजीचे पत्र.
८) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र.मृसमृचा/कृआ/जआप/निवि/ २३०/२०१९, दिनांक. ०३ मे, २०१९.
९) केंद्र शासनाचे क्र.No.2-1/ 2019-Fert Use, दिनांक १२ एप्रिल, २०१९.
१०) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७१९/ प्र.क्र.४३/ १ अे, दिनांक २४ जुलै, २०१९.
११) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र.मृसमृचा/कृआ/जआप/निधी वितरण/४२२/२०१९, दिनांक. १६ ऑगस्ट, २०१९.
१२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र.मृसमृचा/जआप/निधी वितरण/५३०/२०१९ , दिनांक. १६ ऑक्टोबर, २०१९.

प्रस्तावना :-

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासून सुरू केलेला आहे. यामध्ये राज्यातील सर्व गावांची टप्प्या टप्प्याने निवड करून राज्यातील सर्व शेतकऱ्यांना जमिन आरोग्य पत्रिकेचे वितरण करण्यात येणार आहे. जमिन आरोग्य पत्रिकेच्या माध्यमातून त्यांच्या जमिनीचा रासायनिक गुणधर्म स्थिती, प्रमुख अन्नद्रव्यांची पातळी व सूक्ष्म मुलद्रव्ये कमतरता स्थितीची माहिती शेतकऱ्यांना देण्यात येत आहे.

सन २०१५-१६ पासून ही योजना केंद्र व राज्य हिस्सा ६०: ४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र. ४ येथील दि. २७ जून, २०१८ च्या पत्रान्वये, सन २०१८-१९ मध्ये मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी ६० टक्के प्रमाणे रू. ३१२०.४२ लाख व राज्य हिश्श्याची ४० टक्के प्रमाणे रु.२०८०.०३ लाख अशी एकूण रु.५२००.४५ लाख इतक्या रक्कमेचा कार्यक्रम मंजूर केलेला आहे. यास अनुसरून सदर योजना राबविण्यासाठी शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१८ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने सन २०१८-१९ मध्ये सदरची योजना राबविण्यासाठी केंद्र शासनाने दिनांक २१ फेब्रुवारी, २०१९ रोजी केंद्र हिस्सा रूपये ३१०३.८१ लाख उपलब्ध करून दिलेला आहे. या निधीमध्ये सन २०१८-१९ मधील निधीचा दुसरा हप्ता तसेच, सन २०१६-१७ व सन २०१७-१८ मधील प्रलंबित दायित्वाचा समावेश आहे. केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेल्या निधीस अनुसरून राज्य हिस्सा (४०%) रूपये २०६९.२१ असा येत आहे. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेला निधी पुनरूज्जीवित करण्यास दिनांक १२ एप्रिल, २०१९ च्या पत्रान्वये मान्यता दिलेली आहे. यानुषंगाने सदर कार्यक्रम राबविण्यासाठी केंद्र हिस्सा रु. २०००.०० लाख व राज्य हिस्सा रु.१३३३.०० लाख असा एकुण रु.३३३३.०० लाख निधी दिनांक २४ जुलै, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. कृषि आयुक्तालयाने त्यांच्या दि. १६/१०/२०१९ च्या पत्रान्वये केंद्र हिश्याचा एकुण निधी रू.९७.२५ लाख शिल्लक राहणार असल्याचे कळविले असून सदर योजनेसाठी केंद्र हिश्याकरीता रू.१००६.७६ लाख आणि राज्यहिश्या करीता रूपये ६७१.१७ लाख इतका निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केलेली आहे. त्यानुसार राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत मृदा आरोग्य पत्रिका ही योजना राबविण्यासाठी उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम सन २०१९-२० मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिस्सा रु.१००६.७६ लाख व राज्य हिस्सा रु.६७१.१७ लाख असा एकुण रु.१६७७.९३ लाख निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर योजनेकरीता होणारा खर्च हा सन २०१९-२० करीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक : डी-३</u>**
२४०२, मृद व जलसंधारण
(००) (१०१) मृद सर्वेक्षण व चाचणी
(००)(१६) कृषि उन्नती योजना - मृदा आरोग्य पत्रिका (केंद्र पुरस्कृत योजना)
(केंद्र हिस्सा ६०%)(२४०२ अे ०४१) (सर्वसाधारण) योजनांतर्गत
३३-अर्थसहाय्य.

<u>मागणी क्रमांक :डी-३</u>

२४०२, मृद व जलसंधारण

(००) (१०१) मृद सर्वेक्षण व चाचणी

(००)(१७) कृषि उन्नती योजना - मृदा आरोग्य पत्रिका (केंद्र पुरस्कृत योजना)

(राज्य हिस्सा ४०%)(२४०२ अे ०५९) (सर्वसाधारण) योजनांतर्गत

३३-अर्थसहाय्य.

३. **सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे**.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबीवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा. तसेच सदरचा अहवाल राज्य शासनाकडेसुध्दा पाठविण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

५) मृद आरोग्य पत्रिका वितरीत केलेल्या शेतकरी लाभार्थ्यांची यादी ग्रामपंचायत / तालुका कार्यालये/ पंचायत समिती /जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी. तसेच यादी कृषि विभागाच्या संकेतस्थळावर देखील अपलोड करण्यात यावी.

६) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला सर्व निधी सर्व जिल्ह्यांना पी.एफ.एम.एस. (P.F.M.S.) प्रणालीद्वारे वितरीत करावा.

४. कोणत्याही परिस्थितीत मंजुर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही, या बाबत कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ) कृषि आयुक्तालय, पुणे. यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी.

५. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिका-यांना मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

६. सदर योजनेकरीता सन २०१९-२० मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्याच्या दृष्टीने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | संचालक (नि.व गु.नि), आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषि, आयुक्तालय, पुणे. |
| २ | जिल्हास्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी. |

**७.** वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.४४/अर्थ ३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक ०८जुलै, २०१९ मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

८. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक २३९/२०१९, व्यय-१, दिनांक ०९.१०.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधिन राहुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०८१७२६५८५६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2019.11.08 17:31:30 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री ( कृषि )/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) सचिव (कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक (कृषि व पदुम विभाग) मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त ( कृषि),महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
५) संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे
६) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
११) नियोजन विभाग-१४३१
१२) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवडनस्ती.